**मंत्रालय/नवीन प्रशासन भवन येथे येणा-या अभ्यागतांनी/क्षेत्रिय स्तरावरील शासकीय अधिकारी/कर्मचारी व मंत्रालयीन अधिकारी /कर्मचारी यांनी त्यांचे प्रवेशपास/ओळखपत्र दर्शनी भागावर लावणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:- संकीर्ण-१०१७/प्र.क्र.५२६/विशा-४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २० डिसेंबर, २०१८

<u>वाचा</u>:- १. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण-२०१४/प्र.क्र.१६/१८ (र. व का.), दिनांक ०७ मे, २०१४.
२. शासन परिपत्रक, गृह विभाग क्र.संकीर्ण-१०१७/प्र.क्र.५२६/विशा-४ दिनांक ०६ ऑक्टोबर, २०१७.

<u>प्रस्तावना:-</u>

गृह विभागाच्या दिनांक ०६.१०.२०१७ च्या शासन परिपत्रकान्वये सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ०७.०५.२०१४ च्या शासन परिपत्रकात केलेल्या सूचनेनुसार मंत्रालयातील अधिकारी/कर्मचारी यांनी त्यांचे शासकीय ओळखपत्र दर्शनी भागावर लावणे आवश्यक आहे. मंत्रालयातील प्रशासकीय विभागांच्या सर्व आस्थापना प्रमुखांनी सदर बाब त्यांच्या अधिनस्त असलेले मंत्रालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्या पुन्हा निदर्शनास आणावी व सदर सुचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी, अशा सूचना देण्यात आल्या आहेत. तथापि बरेच मंत्रालयीन अधिकारी/ कर्मचारी सूचनांची कोटेकोरपणे अंमलबजावणी करीत नसल्याचे दिसून येते. तसेच मंत्रालयाबाहेरील शासकीय अधिकारी/कर्मचारी, अभ्यागत हे मंत्रालय प्रवेशिका प्लास्टिक पाउच रिबीनसह मंत्रालयाबाहेर जाताना खिशात अथवा बॅगेतून घेवून जात आहेत, ही बाब सुध्दा निदर्शनास आली आहे. त्यामुळे प्लास्टीक पाउच रिबीनसह मंत्रालय गेटवर पूर्ण संख्येने जमा होत नाहीत. सदर बाब मंत्रालय सुरक्षेच्या दृष्टीने योग्य नाही.

सबब, मंत्रालयाच्या सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून शासन खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करीत आहे.

**परिपत्रक:-**

मंत्रालय/ नवीन प्रशासन भवन येथील सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून मंत्रालयाच्या प्रवेशव्दारावर अभ्यागतांना देण्यातयेणा-या प्रवेशपासाच्या प्रक्रियेमध्ये बदल करण्यात आला आहे. अभ्यागतांना तसेच क्षेत्रिय स्तरावरील अधिकारी/कर्मचारी यांना प्लास्टीक पाउच रिबीनसह देण्यात आलेला प्रवेशपास त्यांनी मंत्रालय/ नवीन प्रशासन भवन येथे वावर असेपर्यंत दर्शनी भागावर लावणे बंधनकारक राहील. तसेच बाहेर जातेवेळी प्रवेशव्दारावर तैनात असलेल्या पोलीसांकडे प्लास्टीक पाउच रिबीनसह परत करावा. मंत्रालय सुरक्षा विभागाने याची प्रभावीपणे अंमलबजावणी होईल याची दक्षता घ्यावी. तसेच संदर्भीय सामान्य प्रशासन विभागाच्या परिपत्रकान्वये राज्य शासनातील सर्व शासकीय अधिकारी/कर्मचारी यांनी कार्यालयात असतांना त्यांचे ओळखपत्र दर्शनी भागावर लावणे सक्तीचे करण्यात आले आहे. त्याप्रमाणे मंत्रालयातील अधिकारी/कर्मचारी यांनी त्यांचे शासकीय ओळखपत्र दर्शनी भागावर लावणे आवश्यक आहे.

२. मंत्रालयातील प्रशासकीय विभागांच्या सर्व आस्थापना प्रमुखांनी सदर बाब त्यांच्या अधिनस्त असलेल्या मंत्रालयातील अधिकारी/कर्मचारी व क्षेत्रिय कार्यालयांच्या आस्थापना यांच्या पुन्हा निदर्शनास आणावी व सदर सुचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

३. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१८१२२०१२५०३२००२९ असा आहे. सदर शासन परिपत्रक डिजीटल सवाक्षरीने निर्गमित करण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Hanmanlu Damayyawar

Digitally signed by Ashok Hanmanlu Damayyawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2bd0dc6138e4f3c9997616b47f0dc918cd4715f466afd0623c843397ffc06a09, serialNumber=2cc45c1c1345a8b6ff1e9fdbd2d12c6527f6d070c05b708bcc57b79b7ef3a95d, cn=Ashok Hanmanlu Damayyawar
Date: 2018.12.20 12:54:15 +05'30'

**(अ. ह. दमय्यावार)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.सभापती, विधानपरिषद यांचे सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद यांचे सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा यांचे सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
११. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई यांना विनंती की, सदर सूचना त्यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या सर्व क्षेत्रिय कार्यालयांच्या निदर्शनास आणाव्यात.
१२. प्रधान सचिव, विधान भवन, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
१४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५. पोलीस आयुक्त, मुंबई.
१६. पोलीस उप आयुक्त, मंत्रालय सुरक्षा, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१७. निवडनस्ती गृह विभाग (का.विशा-४).